महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे वर्ग
झालेल्या शासकीय कर्मचा-यांना
निवृत्तीवेतनाचे लाभ मंजूर करण्यासाठी
प्राधिकरणास सहायक अनुदान
(२२१५A०५२)
३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४२०/प्र.क्र.९४/पापु-२३

गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, ७ वा मजला
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीखः ८ ऑक्टोबर, २०२०

**वाचा :-**

१) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः मजीप्रा-२०१४/प्र.क्र.३३(अ)/पापु-२३, दिनांक २३.०३.२०१७.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः संकिर्ण-२०२०/प्र.क्र.६२/कोषा प्रशा-५,दि.१ एप्रिल, २०२०
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६ एप्रिल,२०२०
४) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः मजीप्रा-१११७/प्र.क्र.२३५/पापु-२३, दिनांक ९ जुलै, २०२०.
५) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः बजेट-१४२०/प्र.क्र.९४/पापु-२३, दिनांक १७ जुलै, २०२०

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या कर्मचा-यांच्या वेतन व भत्ते तसेच निवृत्तीवेतनाचे दायित्व शासनाने दिनांक २३.३.२०१७ च्या शासन निर्णयान्वये स्विकारले असून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या सेवानिवृत्त कर्मचा-यांच्या निवृत्तीवेतनावरील खर्च अदा करण्यासाठी अनुदान म्हणून २२१५A०५२ या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष सन २०२०-२१ करिता प्राधिकरणाला रुपये ५७,४०,००,०००/- इतका निधी वाचा मधील अनुक्रमांक ५ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. आता उपरोक्त लेखाशिर्षांतर्गत बिम्सप्रणालीवर उपलब्ध असलेला निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय :-

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे वर्ग झालेल्या शासकीय कर्मचा-यांना निवृत्तीवेतनाचे लाभ मंजूर करण्यासाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये “मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९९, इतर अशासकीय संस्थांना सहाय्य (०१) इतर अशासकीय संस्थांना सहाय्य (०१)(०१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे वर्ग झालेल्या शासकीय कर्मचा-यांना निवृत्तीवेतनाचे लाभ मंजूर करण्यासाठी सहायक अनुदान (अनिवार्य) (२२१५ A०५२) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)” या लेखाशिर्षाखाली रुपये ५,३२,३९,२५०/- (अक्षरी रुपये पाच कोटी बत्तीस लाख एकोणचाळीस हजार दोनशे पन्नास फक्त) एवढे अनुदान प्राधिकरणास खालील अटींच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे.

अ) या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारे अनुदान महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील सेवानिवृत्त अधिकारी/कर्मचारी यांच्या निवृत्तीवेतन लाभांसाठी मंजूर असल्याने या अनुदानामधील रकमेचा खर्च त्याच कामांसाठी होईल याची दक्षता सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी घ्यावी.

आ) पूर्वीच्या थकबाकीसाठी या निधीचा वापर करु नये. या निधीचा अन्य बाबींवरील खर्च (विनियोग) ही वित्तीय अनियमितता समजण्यात येईल व अशा कृतीसाठी संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र राहतील.

इ) मुक्त अनुदानाच्या रकमेचे स्वतंत्र लेखे ठेवण्यात यावेत.

ई) मुक्त अनुदानातून होणा-या वाटपाची माहिती प्राधिकरणाने वेळोवेळी शासनास कळवावी.

उ) मुंबई वित्तीय नियम १९५९ मधील जोडपत्र २ मधील नियम क्रमांक ३ नुसार प्राधिकरणाचे लेखे संबंधित कागदपत्रांसह निरीक्षणाकरिता प्राधिकरणाने सादर करावेत.

ऊ) प्राधिकरणाने मुक्त अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनाला सादर करावे. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी उपयोगिता प्रमाणपत्रात

दर्शविलेल्या मंजूर व मुक्त अनुदानाच्या रकमा तसेच खर्चाच्या रकमा प्रमाणित कराव्यात. त्या उपयोगिता प्रमाणपत्रांवर सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी प्रतिस्वाक्षरी करावी. अशी उपयोगिता प्रमाणपत्रेच शासनाला स्विकारार्ह होतील.

ऋ) मुक्त केलेल्या अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा आणि विहित अहवाल, विहित दिनांकास लेखा अधिकारी, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचेकडे सादर करावा.

२. या शासन निर्णयान्वये वितरीत केलेले अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक (वित्त), श्री.य.बा.पाटील, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून तर श्री.अभय महाजन, सह सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. शासनाद्वारे देण्यात येणारे निवृत्तीवेतन अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS द्वारे प्रदान करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत निवृत्तीवेतन अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व Offline पद्धतीने वितरीत करण्यात येऊ नये.

४. प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च “मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९९, इतर अशासकीय संस्थांना सहाय्य, (०१) इतर अशासकीय संस्थांना सहाय्य, (०१)(०१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे वर्ग झालेल्या शासकीय कर्मचा-यांना निवृत्तीवेतनाचे लाभ मंजूर करण्यासाठी सहायक अनुदान (अनिवार्य) (२२१५ A०५२) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०२०-२१ मधील वित्तीय लेख्यात समाविष्ट करावा.

५. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६एप्रिल, २०२० अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारात तसेच वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्रमांक १०६/व्यय-३, दिनांक ९.६.२०२० अन्वये प्राप्त सहमतीनुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे. परिपत्रकामध्ये नमूद केलेल्या सर्व अटी व शर्तींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१००८११२४२२३१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2020.10.08 13:08:08 +05'30'

**चेतन निकम**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. विधानसभा / विधान परिषद सदस्य, सर्व
२. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
३. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा व अनुज्ञेयता)
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)
६. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा व अनुज्ञेयता)
७. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
९. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, वांद्रे, मुंबई
१०. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थसंकल्प-१८)
११. कार्यासन पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१२. निवड नस्ती कार्यासन पापु-२३